सामान्य प्रशासन विभाग (रा.शि.) यांच्या नियंत्रणाखालील
सह्याद्री राज्य अतिथीगृहाकरिता व्यवस्थापक (गट-ब राजपत्रित)
हे पद पुनर्जिवीत करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक पपुजि-१०११/प्र.क्र.१०३/३१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ सप्टेंबर, २०११

शासन निर्णय :-

सामान्य प्रशासन विभाग, राजशिष्टाचार शाखेच्या नियंत्रणाखालील सह्याद्री राज्य अतिथीगृहातील राज्य अतिथींची वाढलेली संख्या, त्याप्रमाणात अतिथीगृहाच्या कर्मचारी वर्गात झालेली वाढ, त्याचप्रमाणे फ्रन्ट मॅनेजमेंट व इतर कामे आऊट सोर्सिंग केल्याने आऊट सोर्सिंग एजन्सीवरही नियंत्रण ठेवण्याची आवश्यकता, या सर्व बाबी विचारात घेता राजशिष्टाचार विभागाच्या आस्थापनेवर या आधी सह्याद्री राज्य अतिथीगृहात कार्यरत असलेले व त्यानंतर व्यपगत झालेले व्यवस्थापक (गट -ब राजपत्रित) हे पद पुनर्जिवित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन याद्वारे सामान्य प्रशासन विभाग, (राजशिष्टाचार) च्या आस्थापनेवर सह्याद्री राज्य अतिथीगृहाकरिता वेतन बॅन्ड रुपय ९३००-३४८०० + ग्रेड पे ४५००/- या वेतनश्रेणीतील व्यवस्थापक (गट ब राजपत्रित) हे पद पुनर्जिवीत करुन दिनांक २८/२/२०१२ पर्यन्त चालु ठेवण्यास मान्यता देत आहे. उपरोक्त पदाच्या वेतन व भत्यावरील खर्च " मागणी क्रमांक-ए-४, -२०५२ सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०२) सामान्य प्रशासन विभाग, ०१ वेतन -संगणक संकेतांक -२०५२०३२१" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०११-१२ या आर्थिक वर्षापासुन मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या पत्र क्रमांक पदनि २०११/प्र.क्र.१६०/११/ वित्तीय सुधारणा-१, दि.२२/७/२०११ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७२/सेवा-९ दि.३/९/२०११ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०९२११५२०३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( स.ज. मोघे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (का.क्र.३१ मार्फत)
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग
वित्त विभागृ व्यय-४, / वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापक, सह्याद्री / नंदगिरी राज्य अतिथीगृह, मुंबई
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र.३० व ३१
निवड नस्ती.